**मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना सन २०२३-२४ मध्ये राबविण्यासाठी रू. १०.०० कोटी (रुपये दहा कोटी फक्त) एवढा निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मस्त्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. मुअप्र-२०२३/प्र.क्र.१३२ /९-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १९ जून, २०२३

वाचा-

१. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र.राअअ-१११६/प्र.क्र. २४८/१४-अे, दि. २० जून, २०१७
२. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र.कृप्रधो-२०१७/प्र.क्र. २०८/९अे, दि. ३१ ऑक्टोबर, २०१७
३. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र.मुअयो-२०२२/प्र.क्र. ६४/९अे, दि. १७ मे, २०२२
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३
५. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र. मुअप्र-२०२३/प्र.क्र.१३२/९-अे, दि. ११ मे, २०२३
६. आयुक्त (कृषि), पुणे यांचे जा.क्र./मुकृवअप्रयो/१९७७०/२०२३, दिनांक १३.०६.२०२३

**प्रस्तावना :-**

राज्यातील अन्नप्रक्रिया उद्योगाला चालना देणे, शेतीमालाचे मूल्यवर्धन करण्याकरिता शेतकऱ्यांच्या सहभागाद्वारे आधुनिक तंत्रज्ञानावर आधारित प्रकल्प स्थापित करण्यास प्रोत्साहन देणे, उत्पादित अन्न पदार्थाच्या गुणवत्तेमध्ये वाढ व्हावी, उर्जेची बचत व्हावी यासाठीच्या प्रकल्पाच्या आधुनिकीकरणास प्रोत्साहन देणे या उद्दिष्टांसह उपरोक्त वाचा येथील **क्रमांक १** च्या शासन निर्णयान्वये राज्यामध्ये सन २०१७-१८ या आर्थिक वर्षापासून पुढील पाच वर्षासाठी मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना ही १००% राज्य पुरस्कृत योजना सुरु करण्यात आली. तद्नंतर वाचा येथील क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये सदरहू योजना २०२२-२३ या आर्थिक वर्षापासून पुढील पाच वर्षाकरिता चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदरहू योजनेची सन २०२३-२४ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी वाचा येथील क्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये रू.१००.०० कोटी रक्कमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आयुक्त (कृषि), पुणे यांनी सदरहू योजनेंतर्गत मंजूरी दिलेल्या प्रकल्पांसाठी रुपये ४९.५७ कोटी एवढा निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती वाचा येथील क्रमांक ६ च्या पत्रान्वये केली आहे. वित्त विभागाने उपरोक्त वाचा येथील क्रमांक ४ च्या परिपत्रकान्वये एप्रिल ते जून, २०२३ या तिमाहीसाठी एकूण तरतूदीच्या २०% च्या मर्यादेत निधी वितरणास विभागास अधिकार प्रत्यायोजित केले आहेत. त्यानुसार एकूण तरतूदीच्या २०% च्या मर्यादेत विभागास उपलब्ध करुन दिलेला रुपये १०.०० कोटी (रुपये दहा कोटी फक्त) एवढा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबत शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे...

**शासन निर्णय :-**

मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना सन २०२३-२४ मध्ये राज्यात राबविण्याकरिता रुपये १०.०० कोटी (रुपये दहा कोटी फक्त) एवढा निधी आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. चालू वर्षी या योजनेअंतर्गत निधी उपलब्ध करुन दिल्यानंतर तो प्रथमत: प्रलंबित प्रकरणांसाठी वापरण्यात यावा. प्रलंबित प्रकरणे निकाली निघाल्यानंतर उर्वरित निधी सन २०२३-२४ मधील पात्र प्रकल्पांसाठी वापरावा.

३. संदर्भांकित शासन निर्णय दि.२० जून, २०१७ व दिनांक १७ मे, २०२२ अन्वये विहित केलेल्या तरतुदींनुसार सदर योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी व त्यानुषंगाने योजना सन २०२३-२४ मध्ये राबविण्याकरिता मार्गदर्शक सूचना कृषि आयुक्तालय स्तरावरून निर्गमित कराव्यात.

४. सदर योजना सन २०२३-२४ मध्ये राबविण्याकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी तर सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर योजनेसाठी उपलब्ध होणारा अर्थसंकल्पीत निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा

मागणी क्र. डी-३, २४०१-पीक संवर्धन,

(००)(१०२) अन्नधान्य पीके,

(००)(३४) मुख्यमंत्री कृषी व अन्न प्रक्रिया योजना (१००% राज्य योजना)

(२४०१ A ७९१), ३३, अर्थसहाय्य

६. राज्य शासनाने विहीत केलेले नियम/सुचनांचे पालन करून लेखापरिक्षण करून निधी वितरणाचे उपयोगिता प्रमाणपत्र राज्य शासनास सादर करावे.

७. निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित नियम, वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

८. सदर आदेश, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं.-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०६१९१९३४०१९००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.06.19 19:35:17 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई-३२.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
४) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६) मा. विरोधीपक्षनेते, विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई.
७) मा. विरोधीपक्षनेते, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
८) मा. विधान परिषद/विधानसभा सदस्य, विधानमंडळ सचिवाल, मुंबई.
९) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
१०) अपर मुख्य सचिव (कृषि), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
११) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
१२) संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) सर्व विभागीय कृषि सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१४) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१५) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षण)-१/२, मुंबई/नागपूर.
१७) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१८) संचालक, लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई (२ प्रती)
१९) सहसंचालक, लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
२०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२१) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई - ३२
२२) कक्ष अधिकारी (का.१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२३) कक्ष अधिकारी (अर्थ.-१३/व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२४) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२५) निवड नस्ती-९-अे.